शालेय शिक्षण व क्रीडा विभागात ई-गव्हर्नन्स प्रकल्पांतर्गत PWC च्या सल्लागाराना सेवा शुल्क अदा करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: ईगव्ह-१५१९/प्र.क्र. २०/संगणक**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २ जूलै, २०२०

वाचा :-

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.मातसं ०८०/४/२०१४/-०/० माहिती व तंत्रज्ञान संचालनालय -DIT (MH), दिनांक ९ मे, २०१९
२) प्रकल्प अंमलबजावणी बैठक, दि.२६.१२.२०१९
३) शासन निर्णय, शालेय शिक्षण विभाग क्र. ईगव्ह-१५१९/प्र.क्र.२०/संगणक, दि.२१ जानेवारी, २०२०.
४) शासन निर्णय, शालेय शिक्षण विभाग क्र. ईगव्ह-१५१९/प्र.क्र.२०/संगणक, दि. २२ जून, २०२०.
५) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आशि/२०२०-२१/PWC/ ई-गव्हर्नन्स/१४३/१६७४ , दि.२५ जून, २०२०.

प्रस्तावना:-

संदर्भ क्र.१ च्या अनुषंगाने शालेय शिक्षण विभागात कार्यरत असलेल्या PWC च्या ५ पूर्णवेळ सल्लागारांना संदर्भ क्र.३ अन्वये नियुक्त करण्यात आले आहे. सदर PWC चे ५ सल्लागार मार्च, २०२० पासून कार्यरत आहेत. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी PWC सल्लागारांचे एप्रिल व मे, २०२० चे एकत्रित सेवाशुल्क रु.३२,७०,९६०/- निधीची मागणी संदर्भ क्र.५ अन्वये केली आहे. त्या अनुषंगाने विभागात कार्यरत PWC सल्लागारांच्या सेवा शुल्कापोटी निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

१. आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी प्रस्तावित केल्यानुसार PWC सल्लागारांच्या सेवा शुल्कापोटी रु.३२,७०,९६०/- निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. PWC सल्लागारांचे सेवा शुल्क संदर्भ क्र.१ वरील शासन निर्णयान्वये विहित केल्यानुसार तसेच कार्यादेशात नमूद अटी व शर्तीनुसार अदा करण्यात येत आहे.

३. PWC सल्लागारांचे एप्रिल व मे,२०२० महिन्याच्या सेवाशुल्क देयकाचा तपशिल खालील तक्त्याप्रमाणे आहे.

| अ. क्र. | पदनाम | प्रतिमाह सेवा शुल्क दर | कालावधी | रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | वरिष्ठ सल्लागार | २,७७,२०० | १ एप्रिल, २०२० ते ३१ मे, २०२० | ५,५४,४०० |
| २ | वरिष्ठ सल्लागार | २,७७,२०० | १ एप्रिल, २०२० ते ३१ मे, २०२० | ५,५४,४०० |
| ३ | वरिष्ठ सल्लागार | २,७७,२०० | १ एप्रिल, २०२० ते ३१ मे, २०२० | ५,५४,४०० |
| ४ | वरिष्ठ सल्लागार | २,७७,२०० | १ एप्रिल, २०२० ते ३१ मे, २०२० | ५,५४,४०० |
| ५ | वरिष्ठ सल्लागार | २,७७,२०० | १ एप्रिल, २०२० ते ३१ मे, २०२० | ५,५४,४०० |
| | | | Total | २७,७२,००० |
| | | | CGST ९% | २,४९,४८० |
| | | | SGST ९% | २,४९,४८० |
| | | | एकूण | ३२,७०,९६० |

४. सदरचा खर्च मागणी क्रमांक -ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ८० पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२)(५१) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम (२२०२H४५४) ३१ सहायक अनुदाने या लेखाशिर्षातून सन २०२०-२१ च्या उपलब्ध तरतुदीमधुन भागविण्यात यावा. यासाठी आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक व सहायक संचालक, (लेखा) माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण संचालनालय, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २८३/व्यय-५, दिनांक ०४.०६.२०२० अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७०२११३३४४२९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin
Rajaram
Mundhe

Digitally signed by Pravin Rajaram Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ad4976f306de2810214ec2ea330d9daea59f1d3f45fae9227a3feaa541af10d1, serialNumber=dc78036626ec580d66c0ac502d43af5f670b5ba13f51213ad071acd53714a284, cn=Pravin Rajaram Mundhe
Date: 2020.07.02 12:14:01 +05'30'

**(प्रविण मुंढे)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा.अ.मु.स. वित्त विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२) मा.अ.मु.स. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३) मा.प्र.स.माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई

४) आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
६) महालेखापाल(लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर१/२.
७) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर१/२.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
९) निवडनस्ती/संगणक कार्यासन.